राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील पीआयपी अंतर्गत विविध लेखा शिर्षान्वये मंजूर असलेल्या अनुदानातून विविध कार्यक्रमाकरीता आवश्यक असलेल्या छपाई साहित्य करीता निविदा प्रक्रियासाठीच्या खर्चाच्या प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन पुरकपत्र क्रमांकः प्रशामा-०६१९/प्र.क्र.३६५/आरोग्य-७**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०००01.
दिनांक : ०९ डिसेंबर, २०२०.

वाचा :-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-०६१९/प्र.क्र.३६५/आरोग्य-७, दिनांक ०१ ऑगस्ट, २०१९.
२) शासन शुध्दीपत्रक सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. प्रशामा-०६१९/प्र.क्र.३६५/आरोग्य-७, दिनांक ३१ जानेवारी, २०१९.
३) अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), कुटुंब कल्याण व माताबाल संगोपन कार्यालय, पुणे यांचे पत्र क्र. राकुकका/बाल आरोग्य कक्ष/१५ क/NIPI अंतर्गत छपाई/पुनश्च प्रशासकीय मान्यता/५८२६३-६६/२०१९, दिनांक १९ सप्टेंबर, २०१९.
४) अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), कुटुंब कल्याण व माताबाल संगोपन कार्यालय, पुणे यांचे पत्र क्र. राकुकका/बाल आरोग्य कक्ष/१५ क/MAA कार्यक्रम साधनसाहित्याची छपाई/पुनश्च प्रशासकीय मान्यता/५१०३३-३५/२०२०, दिनांक ०९ नोव्हेंबर, २०२०.

प्रस्तावना:-

संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील दिनांक ०१ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील पीआयपी अंतर्गत विविध लेखा शिर्षान्वये मंजूर असलेल्या अनुदानातून विविध कार्यक्रमाकरीता आवश्यक असलेल्या छपाई साहित्य करीता प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

शासनाकडून दिनांक ०१.०८.२०१९ रोजी प्रशासकीय मान्यता देऊनही बाल आरोग्य कार्यक्रमांतर्गत MAA- Mother॰s Absolute Affection कार्यक्रमाच्या साधन साहित्याच्या छपाईची निविदा प्रक्रिया राबविण्यास आयुक्तालयातील खरेदी कक्ष, मुंबई यांनी विहीत प्रकिया केली नाही..

आता, प्रशासकीय मान्यतेचा एक वर्षाचा कालावधी संपुष्टात आल्याने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्र.२.१३ प्रमाणे आरसीएच पीआयपी सन २०१९-२० मध्ये बाल आरोग्य कार्यक्रमांतर्गत MAA- Mother॰s Absolute Affection कार्यक्रमाच्या साधन साहित्याच्या छपाईस सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील दिनांक ०१ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील पीआयपी अंतर्गत विविध लेखा शिर्षान्वये मंजूर असलेल्या अनुदानातून विविध कार्यक्रमाकरीता आवश्यक असलेल्या छपाई साहित्य खरेदी करण्यासाठी एकूण रक्कम रु.३४५१.८० लक्ष एवढया रकमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. परंतू, त्यानूसार खरेदी प्रक्रिया विहित कालावधी पूर्ण झालेली नाही. तथापि, प्रशासकीय मान्यतेचा एक वर्षाचा कालावधी संपुष्टात आल्याने संदर्भाधीन दिनांक ०१.०८.२०१९ च्या प्रशासकीय मान्यतेस मुदतवाढ देण्यात येत असुन सदर खरेदीचा खर्च सन २०२०-२१ मध्ये या प्रयोजनार्थ संबंधित लेखाशिर्षात BDS प्रणालीवर उपलब्ध असलेल्या व वितरीत केलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यास शासन निर्णय दि.०१.०८.२०१९ मधील इतर सर्व बाबी तसेच अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

तसेच दिनांक ०१.०८.२०१९ च्या शासन निर्णयातील इतर अटी व शर्ती कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संकेताक २०२०११०९१३१८१२९५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.12.09 15:19:13 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)